दुग्धव्यवसाय विकास विभागातील गट-अ व गट -ब मधील अधिका-यांच्या बदल्यांचे अधिकार प्रत्यार्पित करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : दुविप्र १११५/प्र.क्र.५/ पदुम ६**
मंत्रालय विस्तार,मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ११ फेब्रुवारी, २०१५.

वाचा :- १) महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५.
२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-२०१४/व्हीआयपी २८४/प्र.क्र.३६२/१२, दिनांक २६.११.२०१४.
३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-२०१४/व्हीआयपी २९३/प्र.क्र.३६२/१२, दिनांक ९.१२.२०१४.

**प्रस्तावना :-**

शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन करण्यासाठी आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध करण्यासाठी तरतूद करण्याकरीता अधिनियम २००५, अंमलात आला आहे. या अधिनियमातील कलम-६ मध्ये गट-अ व गट-ब संवर्गातील अधिका-यांच्या बदल्या करण्यास सक्षम प्राधिकारी निश्चित करण्यात आलेले आहेत. सदर अधिनियमातील कलम-६ मधील परंतुक २ व कलम ७ मधील तरतुदीनुसार दुग्धव्यवसाय विकास विभागातील गट-अ व गट-ब संवर्गातील बदल्यांचे अधिकार प्रत्यार्पित करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५, च्या कलम ६ मधील परंतुक २ व कलम ७ नुसार दुग्धव्यवसाय विकास विभागामधील गट-अ व गट-ब संवर्गातील अधिका-यांची बदली करण्याचे अधिकार खालीलप्रमाणे प्रत्यार्पित करण्यात येत आहेत :-

| अ. क्र. | अधिका-यांच्या पाचव्या वेतन आयोगातील वेतनश्रेणीनुसार गट | महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन अधिनियम २००५ मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिकारी | बदली करण्याचा अधिकार प्रत्यार्पित करावयाचा अधिकारी |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १ | रु.१०,६५०-१५,८५० व त्यापेक्षा अधिक वेतनश्रेणी असलेले गट-अ मधील सर्व अधिकारी | मा. मुख्यमंत्री | मा. मंत्री |
| २ | रु. १०६५० -१५,८५० पेक्षा कमी वेतनश्रेणी असलेले गट-अ मधील सर्व अधिकारी | मा. मंत्री (पदुम) | सचिव (पदुम) |

| | | | |
|---|---|---|---|
| ३ | रु. ७४५०-११,५०० व त्यापेक्षा कमी वेतनश्रेणी असलेले गट-ब मधील सर्व अधिकारी | मा. मंत्री (पदुम) | आयुक्त (दुग्धव्यवसाय विकास) |

२. वरीलप्रमाणे प्रदान केलेल्या बदल्यांच्या अधिकारांचा वापर करीत असताना महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार कार्यवाही करणे बंधनकारक राहिल.

३. वरीलप्रमाणे प्रदान केलेल्या बदल्यांच्या अधिकारांचा वापर करीत असताना कायद्याचे काटेकोरपणे पालन केले जाईल याची दक्षता घेण्यात यावी. या आदेशांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात कसूर झाल्याचे निदर्शनास आले तर संबंधीतांनाविरुध्द तातडीने कडक शिस्तभंगाची कार्यवाही सुरु केली जाईल याची संबंधीतांनी नोंद घ्यावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१११५२७४४९५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sathe Shashank M

Digitally signed by Sathe Shashank M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agri & ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sathe Shashank M
Date: 2015.02.13 13:02:33 +05'30'

**(श.मा. साठे)**

**शासनाचे उप सचिव**

**प्रत :**

१. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

२. मा. मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

३. सचिव (पदुम) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई

४. आयुक्त दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई

५. महाव्यवस्थापक, बृहन्मुंबई दूध योजना, वरळी, मुंबई

६. सर्व प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी

७. सर्व जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी

८.निवड नस्ती